शासकीय वसतिगृहांमध्ये खास बाब
अंतर्गत प्रवेश देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१५/प्र.क्र.११/शिक्षण-२**
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक: १८ जून, २०१५

वाचा -

१) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक : बीसीएच-१०८२/९०३६५/(३८)/बीसीडब्ल्यू-४, दि. १६ मे १९८४.

२) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक : बीसीएच-१०९६/प्र.क्र.१४/मावक-४, दि.१३ जून १९९६.

३) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : बीसीएच-२००३/ प्र.क्र.६५५/मावक-४, दि.६ जुलै २००४.

४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : खाबाप्र-२०१२/ प्र.क्र.११६/शिक्षण-२, दि.१६ मे २०१२.

५) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : बीसीएच -२०१२/ प्र.क्र.११६/शिक्षण-२, दि.२२ जून २०१२.

६) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : खाबाप्र-२०१२/ प्र.क्र.११६/शिक्षण-२, दि.२ जुलै २०१२.

७) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : बीसीएच -२०१२/ प्र.क्र.११६/शिक्षण-२, दि.३० जुलै २०१४.

८) आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्रमांक सकआ/ शिक्षण/ शावगृहे/ प्रवेश/ २०१४-१५/का-४/१२४, दि.१९ जानेवारी २०१५.

९) मा.मंत्री (सा.न्या.) महोदयांकडे दि.०७ जानेवारी, २०१५ रोजी पुणे येथे झालेली बैठक.

प्रस्तावना -

राज्यातील गुणवंत विद्यार्थ्यांची शासकीय वसतिगृहे वगळता सर्व मागासवर्गीय मुला-मुलींच्या शासकीय वसतिगृहांतील दरवर्षी रिक्त होणाऱ्या जागांपैकी १५ % जागा शासन निर्णय दि. १३ जून १९९६ अन्वये खास बाब अंतर्गत शासन स्तरावरुन भरण्यात येत होत्या. मात्र, शासन निर्णय दि. २ जुलै २०१२ अन्वये सदर खास बाब अंतर्गत शासन स्तरावरुन भरण्यात येणाऱ्या १५ % जागा शासन स्तरावरुन न भरता जिल्हास्तरावर संबंधित सहायक आयुक्त, समाजकल्याण यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीमार्फत भरण्यास मान्यता देण्यात आली होती. तथापि, सदर १५ % जागांमधील १० % जागा पुन्हा शासन स्तरावरुन भरण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

सामाजिक न्याय विभागांतर्गत मागासवर्गीय विद्यार्थ्यांकरिता चालविण्यात येणाऱ्या शासकीय वसतीगृहांपैकी गुणवंत विद्यार्थ्यांची वसतिगृहे वगळता इतर सर्व शासकीय वसतिगृहांतील दरवर्षी रिक्त होणाऱ्या जागांपैकी १५ % जागा दि.०२.०७.२०१२ रोजीच्या शासननिर्णयान्वये संबंधित जिल्ह्याच्या सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांचे अध्यक्षतेखालील समितीमार्फत भरण्यात येत होत्या. तथापि, या १५ % जागांमधील १० % प्रमाणे येणाऱ्या जागा (उदा. जर १५ % प्रमाणे १५ जागा रिक्त असतील तर त्यांपैकी १० जागा ) खास बाब म्हणून शासन स्तरावरुन भरण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर खास बाब म्हणून वसतिगृहात प्रवेश देण्याची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे राहील:-

१. खास बाब अंतर्गत प्रवेश मिळण्यासाठी स्वतंत्र अर्जाद्वारे विनंती करणाऱ्या विद्यार्थ्यांनी वसतिगृह प्रवेशाबाबत **विहीत मुदतीत ऑनलाईन अर्ज करणे** बंधनकारक आहे. विहीत मुदतीत ऑनलाईन अर्ज नसणाऱ्या विद्यार्थ्यांचा खास बाब अंतर्गत प्रवेश मिळण्यासाठी विचार केला जाणार नाही.

२. खास बाब प्रवेश हे त्या त्या वर्षीच्या वसतिगृहातील एकूण रिक्त जागांमधील १० % रिक्त जागांकरिता राहतील.

३. सदर रिक्त जागांची वसतिगृहनिहाय व आरक्षणनिहाय यादी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी दरवर्षी दि.१५ ऑगस्ट पर्यंत शासनास सादर करावी.

४. १० % रिक्त जागांमधील ५ % जागा ह्या सर्व मागासप्रवर्गातील व्यवसायाभिमुख अभ्यासक्रमांच्या विद्यार्थ्यांसाठी व ५ % जागा ह्या सर्व मागासप्रवर्गातील सर्वसाधारण अभ्यासक्रमांच्या विद्यार्थ्यांसाठी आरक्षित राहतील.

५. जर शासकीय वसतिगृहाच्या ठिकाणी/परिसरात/क्षेत्रात व्यावसायिक अभ्यासक्रमाची महाविद्यालये/संस्था कमी असल्यास, त्यांपैकी काही जागा अथवा अशा संस्था अजिबात उपलब्ध नसल्यास सर्व ५ % जागा ह्या सर्वसाधारण अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांसाठी वर्ग करण्यात येतील.

६. खास बाब कोट्यातील जागेवर संबंधित अभ्यासक्रमातील कोणत्याही इयत्तेपासून विद्यार्थी प्रवेशास पात्र राहतील.

७. १० % जागांवर करण्यात येणाऱ्या खास बाब प्रवेशासाठी संबंधित विद्यार्थ्याच्या पालकाचे उत्पन्न शासकीय वसतिगृहात प्रवेशासाठी विहीत केलेल्या उत्पन्न मर्यादेत असावे.

८. खास बाब अंतर्गत प्रवेशासाठी दरवर्षी दिनांक **१५ सप्टेंबर पर्यंत** या विभागास प्राप्त झालेली शिफारस पत्रे विचारात घेण्यात येतील. त्यानंतर प्राप्त झालेल्या पत्रांचा प्रवेशासाठी विचार केला जाणार नाही.

९. विभागास दि.१५ सप्टेंबर पर्यंत प्राप्त शिफारस पत्रांनुसार व उपलब्ध रिक्त जागांचा विचार करुन कोणाला खास बाब अंतर्गत प्रवेश द्यायचा याबाबत शासन स्तरावर निर्णय घेण्यात येईल..

१०.खास बाब अंतर्गत प्रवेश मिळालेल्या विद्यार्थ्यांची यादी दरवर्षी **दि.३० सप्टेंबर पर्यंत** विभागामार्फत जाहीर करण्यात येईल. सदर यादी जाहीर झाल्यानंतर काही जागा रिक्त राहील्यास अथवा यादीमधील विद्यार्थ्यांनी प्रवेश न घेतल्यामुळे रिक्त राहिलेल्या जागा संबंधित जिल्ह्याच्या सहायक आयुक्त, समाजकल्याण यांनी वसतिगृह प्रवेशाबाबत प्रचलित शासन निर्णयांत नमूद आरक्षणानुसार व गुणवत्तेनुसार भरण्याबाबत कार्यवाही करावी.

११. खास बाब अंतर्गत प्रवेशास पात्र ठरलेल्या विद्यार्थ्यास प्रवेश देतांना त्यास प्रचलित ऑनलाईन प्रणालीद्वारे प्रवेश मिळाला नसल्याची खातरजमा संबंधित जिल्ह्याच्या सहायक आयुक्त, समाजकल्याण यांनी करावी.

१२. सदरहू खास बाब अंतर्गत प्रवेश गुणवंत विद्यार्थ्यांच्या मागासवर्गीय शासकीय वसतिगृहांना लागू राहणार नाहीत.

२. वरीलप्रमाणे खास बाब अंतर्गत शासन स्तरावरुन भरल्या जाणाऱ्या १० % जागा वगळता उपरोक्त १५ % जागांमधील उर्वरीत ५ % ( अपंगांसाठी ३ % व अनाथ विद्यार्थ्यांसाठी २ %) जागा भरण्याची कार्यवाही शासननिर्णय दि. ०२.०७.२०१२ मधील तरतुदींनुसार संबंधित जिल्ह्याच्या सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांचे अध्यक्षतेखालील समितीमार्फत भरण्यात याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१५०६१८१३१४१८८३२२** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pratap P Lubal

Digitally signed by Pratap P Lubal
DN: CN = Pratap P Lubal, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.06.18 17:03:37 +05'30'

**(प्र.पां.लुबाळ)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री/राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, यांचे खासगी सचिव

२. मा.प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
३. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. आयुक्त, अपंगकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
७. सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण
८. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
९. सर्व सह सचिव/ उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती.